प्रशासन अधिकारी (गट-ब) पदावरुन वरिष्ठ प्रशासन
अधिकारी (गट-अ) या पदावर पदोन्नती व पदस्थापना

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्र.पसंप्र-२०१८/प्र.क्र.२५२/पदुम-१**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २७ डिसेंबर, २०१८.**

शासन आदेश :-

पशुसंवर्धन विभागातील प्रशासन अधिकारी (गट-ब) (वेतनश्रेणी रु.९३००- ३४८०० ग्रेड पे ४४००/-) या संवर्गातील अधिकाऱ्यांना वरिष्ठ प्रशासन अधिकारी गट-अ (वेतनश्रेणी १५६००-३९१०० ग्रेड पे ५४००) या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून, पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्रमांक ४ येथे नमूद ठिकाणी करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | प्रवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १. | श्री. गो . दि. गिरासे | खुला | वरिष्ठ प्रशासन अधिकारी,प्रादेशिक पशुसंवर्धन, सहआयुक्त कार्यालय, नागपूर |
| २. | श्री. म.श. पाटील | खुला | वरिष्ठ प्रशासन अधिकारी,प्रादेशिक पशुसंवर्धन, सहआयुक्त कार्यालय, मुंबई. |
| ३. | श्री. गु.ना. पाटील | खुला | वरिष्ठ प्रशासन अधिकारी,प्रादेशिक पशुसंवर्धन, सहआयुक्त कार्यालय, औरंगाबाद |

२. **मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र. २७९७/२०१५ मध्ये दि.४/८/२०१७ रोजी दिलेल्या** निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा. उच्च न्यायालयाच्या निर्णया विरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबाबत विधी व न्याय विभागाने दि.२८/१२/२०१७ रोजी खुल्या प्रवर्गातील कर्मचा-यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय दिले आहेत. तूर्तास पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवा जेष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या आधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवा जेष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दिनांक २५/५/२००४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाजेष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा सूचना सा.प्र.वि./कार्यासन १६-ब ने दिनांक २९/१२/२०१७ रोजीच्या पत्रान्वये दिल्या आहेत.

३. सा.प्र.वि./कार्यासन १६-ब यांनी उपरोक्त दि. २९/१२/२०१७ च्या पत्रान्वये दिलेल्या निर्देशानुसार सदर पदोन्नत्या तदर्थ व पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निवळ तात्पुरत्या स्वरुपात सेवा ज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञेय याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून भरण्याबाबत सा.प्र.वि./१६ब यांनी दिनांक २९/१२/२०१७ च्या पत्रान्वये दिलेल्या सुचना नुसार देण्यात येत आहेत.

४. वरिष्ठ प्रशासन अधिकारी या पदावर पदोन्नती नंतर पदस्थापनेच्या पदावर हजर होण्यासाठी संबधित नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त अधिका-यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी.

५. संबंधित अधिकाऱ्याने पदोन्नतीच्या पदावर हजर न होता लोकप्रतिनिधी मार्फत पदस्थापनेत बदल करण्याबाबत शासनावर दबाव आणल्यास ते म.ना.से. (शिस्त व अपील) नियम १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८१२२७११५७२३१२०१ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vijay K. Chaudhari
Date: 2018.12.27 12:03:51 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१) आयुक्त पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य, औंध,पुणे-०७.
२) प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त,पुणे/औरंगाबाद/नागपूर/कोकण विभाग
३) सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त
५) सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी
६) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/औरंगाबाद/नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकरी ,बांद्रा मुंबई
९) संबंधित अधिकारी,द्वारा आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१०)निवडनस्ती-१